**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ करीता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत (लेखाशिर्ष २२३५सी१६१, २२३५सी१७२)**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२० / प्र.क्र.६ / कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २३ एप्रिल, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची नस्ती क्र.विसयो २०२०/प्र.क्र.७४/विसयो.

**शासन निर्णय:-**

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२० (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रक्कमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली आहे आणि ते सन २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दि.१८.०३.२०२० मध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, Covid-१९ च्या पार्श्वभूमीवर संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनांतर्गत लाभार्थ्यांना एकत्रितरित्या सहाय्य करणे आवश्यक असल्याने वित्त विभागामार्फत या योजनांकरीता सद्यस्थितीत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर एकूण अर्थसंकल्पित तरतूदींच्या ५० टक्क्यांच्या मयादेतील निधी वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आला आहे. त्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता खालीलप्रमाणे योजनांकरीता निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ. क्र. | मागणी क्रमांक / मुख्य लेखाशिर्ष /योजनेचे नाव | बाब/उद्दिष्ट | सन २०२०-२१ साठीची अर्थसंकल्पीय तरतूद | ५०% च्या मर्यादेत वितरित करावयाची तरतुद |
|---|---|---|---|---|
| | मागणी क्र. टी-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना | | | |
| १ | (०२)(०३) संजय गांधी निराधार अनुदान योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१६१) | ५०- इतर खर्च | ७५००.०० | ३७५०.०० |
| २ | (०२)(०४) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१७२) | ५०- इतर खर्च | १५५००.०० | ७७५०.०० |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी वितरीत तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या दि.२३.०४.२०२० रोजीच्या टिप्पणीन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२४१०११०७०७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.04.24 13:52:13 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
६. सर्व प्रकल्प, अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. कार्यासन क्र.१२/ निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.